**अटल महापणन विकास अभियानांतर्गत राज्यातील शहरी भागातील सहकारी गृहनिर्माण संस्थांमध्ये कृषी उत्पादनांची विक्री व्यवस्था राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र. २७२/२४ स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४ ऑक्टोंबर, २०१८

**संदर्भ** :-१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१७/ प्र.क्र.२७३/२४ स, दिनांक २६ डिसेंबर,२०१७

**प्रस्तावना:**

महाराष्ट्रातील कृषी उत्पादनांची विक्री व्यवस्था उभारणे,शेतकरी ते ग्राहक यातील मध्यस्थांचे उच्चाटन करणे,शेतकऱ्यांच्या कृषी मालाला रास्त दर मिळवून देणे, या करीता सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग प्रयत्न करीत आहे. शहरी भागामध्ये राहणाऱ्या रहिवाशांना देखील रास्त भावात जीवनावश्यक शेतमाल उपलब्ध होणे आवश्यक असते. सहकाराअंतर्गत सहकार या सहकारी मूल्यातून शेतकऱ्यांच्या सहकारी संस्था,शेतकरी उत्पादक कंपन्या, शेतकरी गट,यांचे मार्फत शहरी भागातील सहकारी गृहनिर्माण संस्थांमध्ये त्यांच्या सभासदांना,रहिवाशांना रास्त दरात चांगला शेतमाल पुरविता येऊ शकतो. मुंबई ,ठाणे, पुणे इ . प्रमुख शहरांमध्ये विविध संस्था, शेतकरी गट, बचत गट इ. मार्फत गृहनिर्माण संस्थांच्या आवारामध्ये शेतमाल विक्रीसाठी प्रयत्न होत आहेत. मात्र या प्रयत्नामध्ये सुसूत्रता व सातत्य नसल्यामुळे अद्याप या संकल्पनेचा प्रचार व प्रसार पुरेसा झालेला नाही. तसेच या प्रयत्नांची संकल्पना एकत्रितरित्या राबविली जात नसल्यामुळे सातत्यपूर्ण यश प्राप्त होताना दिसत नाही.

राज्यातील सहकारी पणन व्यवस्था अर्थात राज्य सहकारी पणन महासंघ,खरेदी विक्री संघ,विविध कार्यकारी सहकारी संस्था, शेतकरी उत्पादक संस्था व महिला बचत गट यांचे सक्षमीकरणासाठी शासन दिनांक २५ डिसेंबर, २०१६ पासून अटल महापणन विकास अभियान राबवित आहे.या अभियानाच्या दिनांक २६ डिसेंबर,२०१७ च्या शासन निर्णयातील २ (J) या मुद्दयानुसार ग्रामीण भागातील शेतक-यांचा कृषी माल हा सहकारी पणन व इतर संस्थांव्दारे शहरी भागातील ग्राहकाला सहकारी गृहनिर्माण संस्थांव्दारे विक्री करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील ग्रामिण भागातील शेतमाल,दुग्ध उत्पादने,प्रक्रिया केलेली उत्पादने पुरविण्याऱ्या विविध प्रकारच्या सहकारी संस्था उदा. खरेदी विक्री संघ,वि.का.क संस्था,शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपन्या,महिला बचत गट यांच्याद्वारे राज्यातील शहरी भागातील सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील ग्राहकांना स्वच्छ, ताजा, दर्जेदार स्त्रोत माहिती असलेला कृषीमाल /उत्पादने पुरविण्यासाठी व्यवस्था विकसीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

**योजनेचे उद्देश: -**

१ . शेतक-यांच्या शेतमालास रास्त भाव मिळवून देण्यास सहाय्य करणे.

२.शेतकरी ते ग्राहक यांच्यातील विविध पातळयांवरील मध्यस्थाची संख्या कमी करणे अथवा ती संपुष्टात आणणे.

३. शेतमालाचे मूल्यवर्धन करणेकरीता शेतक-यांस प्रोत्साहित करणे.

४.विविध सहकारी संस्था , शेतकरी गट, शेतकरी उत्पादन कंपन्या,महिला बचत गट यांव्दारे ग्रामीण भागातील शेतकरी - व्यक्ती यांना उदयोगक्षम बनविणे.

५. सहकारी गृहनिर्माण संस्थांमधील सभासद/ रहिवाशी यांना रास्त दरात स्वच्छ ताजा, दर्जेदार , स्त्रोत माहिती असलेला शेतमाल ,डेअरी उत्पादने , प्रक्रिया उत्पादने इ.चा पुरवठा करणे.

६. सहकारी गृहनिर्माण संस्था व पुरवठादार सहकारी संस्था,शेतकरी उत्पादक कंपनी /गट इ. मध्ये -सहकाराअंतर्गत सहकार॰ या मुल्याची जोपासना करणे.

**योजनेची कार्यपध्दती:-**

**१ )सहकारी गृहनिर्माण संस्थेने स्वतः शेतमाल कॉप शॉप चालविणे:-**

- सदर शॉप संस्थेने संस्थेच्या आवारामध्ये स्वतः मार्फत चालवायचे आहे.

- या करीता संस्थेच्या आवारामध्ये किमान १०० स्के. फूट जागेमधे सदर शॉप सुरु करावे

- सदर शॉप करिता आवश्यक उभारणी खर्च संस्थेने स्वतः करावयाचा आहे. संस्थेच्या कार्यालयामध्ये किंवा इतर सुयोग्य ठिकाणी उदा .मनोरंजन हॉल ,मोकळी जागा इ ठिकाणी नियोजन केल्यास कमी खर्चात सदर शॉप उभारता येऊ शकेल.

-सदर शॉपमध्ये संस्थेने मनुष्यबळ ठेवून त्या मार्फत शॉप चालविता येईल

-संस्थेतील रहिवाश्यांच्या निकड व मागणीनुसार शॉपमध्ये विविध डेअरी उत्पादन, शेतमाल, प्रक्रिया उत्पादने इ. यांची मागणी नोंदवून शॉप चालविणारा इसम /ऑपरेटर त्यानुसार संस्थेशी करार केलेल्या सहकारी संस्था, शेतकरी गट /कंपनी, बचत गट इ . ना उत्पादनाची मागणी करेल.

-संस्थेशी करार झालेली सहकारी संस्था, शेतकरी गट /कंपनी, बचत गट हे संस्था व त्यांच्यातील पूर्व नियोजित दराने सदर उत्पादनाचा पुरवठा करतील.

-संस्था सदर माल त्यांच्या रहिवाशांना शॉप मार्फत पुरवण्याची व्यवस्था करेल.

-संस्था व सहकारी संस्था, शेतकरी गट /कंपनी ,बचत गट यांच्यातील करारामुळे व एकत्रित माल मागणी - पुरवठ्यामुळे संस्थेस अल्प दरात उत्पादने मिळून त्यातून शॉप चालविण्याचा खर्च भागविण्यापुरते अतिरिक्त चार्जेस लावून संस्था सदर शॉप चा खर्च भागवू शकते.

- पुरवठादार सहकारी संस्था,शेतकरी गट /कंपनी ,बचत गट यांचेकडे एकत्रित मागणी नोंदविल्यामुळे संस्थेच्या रहिवाशांना स्वस्त दरात व स्वच्छ शेतमाल ,डेअरी उत्पादने व प्रक्रिया केलेली उत्पादने प्राप्त होतील.

-तसेच राहत्या ठिकाणीच दैनंदिन गरज भागविली गेल्याने रहिवाश्यांच्या प्रवास खर्च,वेळ यांची देखील बचत होईल.

-संस्था सदस्य व पुरवठादार संस्था /कंपनी / गट हे परस्पर सामंज्यस्याने उत्पादनाचे दर ठरवतील.

-संस्था एक किंवा गरजेनुसार एकापेक्षा अधिक सहकारी संस्था,शेतकरी गट /कंपनी ,बचत गट यांचे सोबत करार करू शकतील.

**२) सहकारी संस्था /शेतकरी उत्पादक गट/कंपनी /महिला बचत गट यांनी गृहनिर्माण संस्थेतील कॉप शॉप चालविणे:-**

-गृहनिर्माण संस्था हि सहकारी संस्था /शेतकरी गट/कंपनी /महिला बचत गट यांना संस्थेच्या आवारामध्ये शॉप चालवणे करीता किमान १०० स्के.फुट जागा उपलब्ध करून देईल.

-सदर जागेमध्ये सहकारी संस्था /शेतकरी गट/कंपनी /महिला बचत गट स्वखर्चाने शॉप करिता आवश्यक उभारणी करेल.

-सदर शॉप मध्ये मनुष्यबळ हे सहकारी संस्था /शेतकरी गट/कंपनी /महिला बचत गट पुरवेल.

-सदर शॉप चालविणारा इसम /ऑपरेटर हा संस्थेतील रहिवाशांच्या गरज व मागणी नुसार शेतमाल, डेअरी उत्पादने,प्रक्रिया उत्पादने इ ची विक्री रहिवाशांना करेल.

-सदर शॉपमधील उत्पादनाचे दर हे संस्था सदस्य व पुरवठादार सहकारी संस्था /शेतकरी गट/कंपनी /महिला बचत गट हे परस्पर सामंजस्याने ठराविक कालावधी करीता ठरवतील.

-संस्थेला सदर शॉपच्या जागेचे भाडे स्वरूपात अतिरिक्त उत्पन्न प्राप्त होईल तसेच रहिवाशांना अल्प दरात गृहपयोगी वस्तूंचा पुरवठा होईल.

-गृहनिर्माण संस्था व सहकारी संस्था /शेतकरी गट/कंपनी /महिला बचत गट यांच्यातील कराराचा कालावधी किमान ३ वर्षाचा राहील.मात्र करारातील अटी शर्ती यांच्या नुसार करार कालावधी कमी जास्त होऊ शकेल.

**३ )पुरवठादार सहकारी संस्था,शेतकरी उत्पादक कंपनी ,शेतकरी गट ,महिला बचत गट,यांची कृषी उत्पादने विक्रीचे मोबाइल शॉप (वाहन) संस्थेच्या आवारात उभी करणे करीत जागा उपलब्ध करून देणे.**

-गृहनिर्माण संस्था संस्थेच्या आवारात पुरवठादार सहकारी संस्था,शेतकरी उत्पादक कंपनी,शेतकरी गट, महिला बचत गट ,यांची कृषी उत्पादने विक्री चे मोबाइल शॉप (वाहन) करीता जागा उपलब्ध करून देईल .

- पुरवठादार सहकारी संस्था,शेतकरी उत्पादक कंपनी ,शेतकरी गट ,महिला बचत गट त्यांच्या उत्पादनांची या मोबाईल शॉपव्दारे विक्री करतील.

- गृहनिर्माण संस्था जागेचे भाडे नाममात्र दरास सदर संस्थांकडून घेऊ शकते.

- गृहनिर्माण संस्था व पुरवठादार संस्था यांच्यामध्ये मोबाईल शॉप उभे करण्याकरीता जागा पुरवण्याबाबतचा किमान १ वर्षाचा करार अटी शर्तीच्या अधिन राहून करता येईल.

**योजनेची अंमलबजावणी,सनियंत्रण व देखरेख :-**

योजनेची अंमलबजावणी संबंधित जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था यांच्यामार्फत करण्यात येईल.

शहरी भागातील जिल्हा उपनिबंधक,उपनिबंधक/ सहाय्यक उपनिबंधक,सहकारी संस्था उदा.मुंबई शहर, ठाणे, पुणे नवी मुंबई,नागपूर, अमरावती,नाशिक,औरंगाबाद, व इतर जिल्ह्यांच्या ठिकाणी गृहनिर्माण सहकारी संस्था फेडरेशनच्या सहाय्याने शहरातील इच्छुक गृहनिर्माण सहकारी संस्थांनी अदयावत माहिती व यादी तयार करून जिल्हयातील अथवा जिल्हयाबाहेरील पुरवठादार सहकारी संस्था, शेतकरी उत्पादक गट, महिला बचत गट यांचेशी समन्वय करण्याचे कार्य करतील.

ग्रामीण भागातील जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था त्यांच्या जिल्हयातील पुरवठादार सहकारी संस्था, शेतकरी उत्पादक गट,महिला बचत गट यांचेशी समन्वय करून त्यांच्या उत्पादनांची अदयावत माहिती ,यादी इ.पुरक माहिती तयार करून ती शहरी भागातील जिल्हा उपनिबंधक/उपनिबंधक/सहाय्यक उपनिबंधक यांचेशी समन्वय करून जास्तीत जास्त शेतमाल या माध्यमातून विक्री होणेकरीता यथाशक्ती प्रयत्न करतील.यासाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाच्या योजना व राष्ट्रीय कृषि विकास योजनांतर्गत शहरी भागासाठी फळे,भाजीपाला पुरवठा प्रकल्पांतर्गत विक्री व्यवस्थापन बाबींसाठी मार्गदर्शक सुचनांचा उपयोग करण्यात यावा.

**या व्यतिरिक्त संबंधित जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था पुढील भुमिका बजावतील:-**

१.योजनेचा प्रभावी अंमलबजाणीवणी करीता दरमहा बैठक आयोजित करणे.
२.गृहनिर्माण संस्था व पुरवठादार संस्था /गट/कंपनी यांच्यात परस्पर करार करण्याकरिता पोषक वातावरण निर्मिती करणे
३.योजनेचा व्यापक प्रचार व प्रसिध्दी करणे.
४.स्थानिक स्वराज्य संस्था,पोलिस ,इ,संबंधित विभागांशी या योजनेबाबत समन्वय करुन येणा-या अडी -अडचणींवर पर्याय शोधणे.
५.आवश्यकतेनुसार वेळोवेळी योजनेचे मूल्यमापन करणे
६.योजनेच्या फलनिष्पत्तीचा आढावा घेणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००५१७३२५१२२०२ असा आहे. हा आदेश डिजीटली स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ghadyale Sunanda Mohanrao

Digitally signed by Ghadyale Sunanda Mohanrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textiles, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, cn=Ghadyale Sunanda Mohanrao
Date: 2018.10.05 17:38:03 +05'30'

**(सुनंदा मो.घड्याळे)**
**अवरसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा.राज्यपाल याचे प्रधान सचिव राजभवन, मलबार हिल,मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
३) मा.मंत्री(सहकार ,पणन व वस्त्रोद्योग )यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
४) सर्व मंत्री,महाराष्ट राज्य, मंत्रालय,मुंबई
५) मा.राज्यमंत्री(पणन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
६) सर्व राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई
७) मा.मुख्य सचिव, यांचे वरीष्ट स्विय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई
८) अपर मुख्य सचिव,वित्त विभाग,मंत्रालय मुंबई
९) प्रधान सचिव,(पणन)सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१०) प्रधान सचिव,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
११) प्रधान सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१२) प्रधान सचिव,पाटबंधारे विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१३) प्रधान सचिव,(परिवहन),गृह विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१४) प्रधान सचिव,(सहकार) सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१५) प्रधान सचि, (वस्त्रोद्योग),सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई
१६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई
१७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कापूस उत्पादक महासंघ,मुंबई,
१८) व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ पणन महासंघ,नागपूर
१९) सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
२१) पणन संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे
२२) सर्व विभागीय आयुक्त,
२३) सर्व जिल्हाधिकारी,
२४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हापरिषद,
२५) अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य सहकारी बँक,मुंबई

२६) सर्व मुख्य  कार्यकारी अधिकारी,जिल्हा मध्यवर्ती  सहकारी बँक,
२७) सर्व विभागीय सहनिबंधक,सहकारी संस्था,
२८)सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकाय यंत्रणा,
२९) सर्व जिल्हा उपनिबंधक,सहकारी संस्था,
३०) सर्व जिल्हा समन्वय ,महिला आर्थिक विकास महामंडळ,
३१) सर्व जिल्हा पणन अधिकारी,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ,मुंबई
३२) सर्व जिल्हा पणन अधिकारी,विदर्भ  पणन महासंघ,नागपूर
३३) निवडनस्ती,कार्यासन २४ स